जाती प्रमाणपत्राची पडताळणी
जात वैधता सेतु सोसायटीची स्थापना व
सेतु सेवा शुल्क आकारणीबाबत

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२०११/प्र.क्र. ३/मावक-५
दिनांक - १४ जानेवारी, २०११

**वाचा :**-१.शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.सिओएम १००२/प्र.क्र.२४०/०२/३९,दि.२३/८/२००२
२.शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.मातंसं/नस्ती-०७/३७/३९, दि.२६/९/२००८

**प्रस्तावना** - राज्यातील अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागास वर्ग तसेच विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील अर्जदाराच्या जातीच्या प्रमाणपत्राची पडताळणी करण्याकरिता राज्यात १५ विभागीय जाती पडताळणी समित्या सद्य:स्थितीत कार्यरत आहेत. पडताळणी समित्यांचे कामकाज जलद, अचूक होण्यासाठी व त्यात सुसूत्रबध्दता, पारदर्शकता येण्यासाठी समित्यांच्या कामाकाजाचे संगणीकरण करण्यात येत असून, त्याचा एक भाग म्हणुन समित्यांना आवश्यकतेनुसार सेतुची सुविधा उपलब्ध करुन देण्याचे प्रस्तावित आहे. सदर सेतू सुविधा केंद्रामार्फत त्यांच्या सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी आकारावयाचे सेवा शुल्क व जमा झालेल्या निधीचा कशा रितीने विनियोग करण्यात यावा, याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- राज्यातील अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागास वर्ग तसेच विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील अर्जदाराच्या जाती प्रमाणपत्राच्या पडताळणीस अनुसरुन सेतू सुविधा केंद्रामार्फत सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी, राज्यातील १५ विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्यांनी, संबधित अर्जदाराकडून आकारावयाचे सेवा शुल्क खालीलप्रमाणे निर्धारित करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १) विद्यार्थी विषयक प्रकरणे | रु. ५०/- |
| २) सेवा विषयक प्रकरणे | रु. १००/- |
| ३) निवडणूक विषयक प्रकरणे | रु. १००/- |
| ४) अपिल | रु. १००/- |

२. प्रत्येक सेतू सुविधा केंद्रास योग्य त्या सूचना देणे, त्यांच्या सेवेत सुधारणा करणे, सेवा निश्चित करुन कामकाजाचा अवधी निश्चित करणे, नविन सेतु केंद्राची ठिकाणे निश्चित करणे या सर्व बाबीकरिता तसेच सर्व पडताळणी समित्यांतर्गत असलेल्या वा असणा-या सेतु सुविधा केंद्रामध्ये समन्वय असणे आवश्यक असल्याने व जमा झालेल्या निधीचा विनियोग योग्यरित्या होण्यासाठी खालीलप्रमाणे **जात वैधता सेतु सोसायटी** गठीत करण्यात येत आहे :-

## जात वैधता सेतु सोसायटी

| | |
|---|---|
| १) सहसचिव/उपसचिव (सा.न्या.) | अध्यक्ष |
| २) उपसंचालक, समाजकल्याण संचालनालय | सदस्य |
| ३) विभागीय समाजकल्याण अधिकारी, मुंबई विभाग | सदस्य |
| ४) पोलीस दक्षता प्रमुख, विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती क्र.३ | सदस्य |
| ५) सहाय्यक लेखा अधिकारी ( विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी, मुंबई विभाग यांचे कार्यालयातील) | सदस्य |
| ६) अवर सचिव (सा.न्या.) | सदस्य-सचिव |

३. सेतु सुविधा केंद्र स्थापन करण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २३/८/२००२ च्या शासन निर्णयात जिल्हास्तरीय सोसायटीकरिता विहीत केलेली कार्ये, वरील जात वैधता सेतु सोसायटीची राहतील.

४. सदर सेतु सुविधा केंद्र चालविणा-या अशासकीय संस्थेस करार केल्याप्रमाणे ८० % हिस्सा दिल्यानंतर शिल्लक राहणारा २० % हिस्सा संबधित सर्व पडताळणी समित्यांनी वरील सेतु सोसायटीस वर्ग करणे आवश्यक राहील. सेतु सोसायटीने जमा रकमेपैकी १०% रक्कम राज्यस्तरीय सेतु सोसायटीस हिस्सा म्हणून दिल्यानंतर शिल्लक राहणा-या एकूण निव्वळ जमा रक्कमेच्या ७५% इतक्या रक्कमेपर्यंतचा खर्च, सदर सोसायटीस, याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २६/९/२००८ च्या शासन निर्णयात परिच्छेद-३ मध्ये विहित केलेल्या तरतुदीस अनुसरुन करता येईल.

५. सेतु सुविधा केंद्रामध्ये जमा होणा-या निधीच्या विनियोगाबाबत उपरोक्त दिनांक २६/९/२००८च्या शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे कार्यवाही करणे जात वैधता सेतु सोसायटीस बंधनकारक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०११०११४१९५३०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

( सं. द. माने )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव

मा. विरोधी पक्ष नेते, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
मा. विरोधी पक्ष नेते, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक / प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी ,
अध्यक्ष / सदस्य/ सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी, सर्व विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या १,२ व ३
विभागीय समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालय, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपुर, अमरावती, लातुर
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद /सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
आयुक्त, सर्व महानगर पालिका / मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
सर्व कार्यासन, सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.* पत्राद्वारे.

यांना विनंती की, त्यांनी सदर शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी द्यावी.

निवड नस्ती, कार्या.- मावक-५.